**महाराष्ट्र राज्य इतर मागासर्गीय वित्त आणि विकास महामंडळांतर्गत संत नरहरी महाराज आर्थिक विकास महामंडळ या उपकंपनीची (Subsidiary) स्थापना करण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**

**इतर मागास बहुजन कल्याण विभाग,**

**शासन निर्णय क्रमांक : महाम -२०२४/प्र.क्र.४५/महामंडळे**

मोतीमहल इमारत, चर्चगेट , मुंबई ४०० ०२०.

दिनांक :- ०४ मार्च, २०२५

**संदर्भ :-** इतर मागास बहुजन कल्याण विभाग, शासन निर्णय समक्रमांक, दिनांक ०१.१०.२०२४

**प्रस्तावना :-**

सोनार समाजाच्या सामाजिक व आर्थिक विकासासाठी स्वतंत्र महामंडळ स्थापन करण्याची मागणी गेली अनेक वर्षांपासून लोकप्रतिनिधी, विविध संघटना यांचेकडून केली जात आहे. राज्यातील इतर मागास प्रवर्गात समावेश असलेल्या समाजातील युवकांना महाराष्ट्र राज्य इतर मागासवर्गीय वित्त आणि विकास महामंडळांतर्गत राबविल्या जाणाऱ्या विविध योजनांचा (बीज भांडवल योजना, थेट कर्ज योजना, वैयक्तिक कर्ज व्याज परतावा योजना, गट कर्ज व्याज परतावा योजना, शैक्षणिक कर्ज व्याज परतावा योजना,कौशल्य विकास प्रशिक्षण योजना, महिला स्वंयसिध्दी व्याज परतावा योजना) लाभ मिळून सोनार समाजाच्या सर्वांगिण विकासासाठी व आर्थिक उन्नतीसाठी प्रयत्न करण्याकरिता महाराष्ट्र राज्य इतर मागासवर्गीय वित्त आणि विकास महामंडळांतर्गत, उपकंपनी म्हणून संत नरहरी महाराज आर्थिक विकास महामंडळाची (उपकंपनी) स्थापना करण्याची बाब शासनाच्या विचारधीन होती. त्यानुषंगाने सदर महामंडळ (उपकंपनी) स्थापन करण्यास दिनांक रोजी झालेल्या मा. मंत्रिमंडळ बैठकीमध्ये निर्णय घेण्यात आला. मा.मंत्रिमंडळ बैठकीतील सदर निर्णयास अनुसरून महाराष्ट्र राज्य इतर मागासवर्गीय वित्त आणि विकास महामंडळांतर्गत “संत नरहरी महाराज आर्थिक विकास महामंडळ” या उपकंपनीची स्थापना करण्यास संदर्भाधिन दिनांक ०१.१०.२०२४ रोजीच्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे.

सदर शासन निर्णयाच्या अनुषंगाने काही सुधारणा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

**अ)** संदर्भाधिन दिनांक ०१.१०.२०२४ रोजीचा शासन निर्णय या शासन निर्णयान्वये अधिक्रमित करण्यात येत आहे.

**ब)** राज्यातील इतर मागासवर्गीयांची सामाजिक व आर्थिक उन्नती व्हावी यासाठी सध्या कार्यरत असलेल्या महाराष्ट्र राज्य इतर मागासवर्गीय वित्त आणि विकास महामंडळाअंतर्गत इतर मागासवर्गात समाविष्ट असणाऱ्या सोनार समाजाच्या सामाजिक व आर्थिक विकासासाठी आर्थिक विकास महामंडळ स्थापन करण्यास शासन मान्यता देत आहे. सदरचे महामंडळ "संत नरहरी महाराज आर्थिक विकास महामंडळ (महाराष्ट्र राज्य इतर मागासवर्ग वित्त आणि विकास महामंडळाची उपकंपनी)" या नावाने संबोधले

जाईल. महाराष्ट्र राज्य इतर मागासवर्ग वित्त आणि विकास महामंडळाच्या नियंत्रणाखाली सदर उपकंपनीचे कामकाज चालविण्यात येईल.

**क)** संत नरहरी महाराज आर्थिक विकास महामंडळाची रचना, कार्य, राबविण्यात येणा-या योजना याबाबतचा तपशील खालीलप्रमाणे :-

**१. <u>महामंडळाची रचना (राज्यस्तर / जिल्हास्तर )</u>**

उपकंपनीचे मुख्यालय मुंबई येथे महाराष्ट्र राज्य इतर मागासवर्गीय वित्त आणि विकास महामंडळाचे मुख्यालयाच्या ठिकाणी राहील. राज्यातील सर्व जिल्ह्यांमध्ये जिल्हा कार्यालये कार्यरत राहतील.

महामंडळाच्या संचालक मंडळावर अध्यक्ष, उपाध्यक्षांसह तीन अशासकीय सदस्य व खालील चार शासकीय सदस्य राहतील :-

| | | |
|---|---|---|
| १ | मा. मंत्री (इतर मागास बहुजन कल्याण) | पदसिध्द अध्यक्ष |
| २ | **शासन नियुक्त पदाधिकारी**<br>महाराष्ट्र राज्य इतर मागासवर्गीय वित्त आणि विकास महामंडळ मर्या., मुंबई यांचे उपाध्यक्ष | उपाध्यक्ष |
| ३ | **अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव**<br>इतर मागास बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई | संचालक |
| ४ | **सह सचिव / उपसचिव**<br>इतर मागास बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई | संचालक |
| ५ | **संचालक,**<br>इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे | संचालक |
| ६ | **व्यवस्थापकीय संचालक,**<br>महाराष्ट्र राज्य इतर मागासवर्गीय वित्त आणि विकास महामंडळ मर्या., मुंबई | संचालक तथा व्यवस्थापकीय संचालक |
| ७ | **अशासकीय सदस्य - ३** | संचालक |

**२. <u>संत नरहरी महाराज आर्थिक विकास महामंडळाची कार्ये :-</u>**

१. राज्यातील सोनार समाजाच्या कल्याण व विकासासाठी काम करणे.
२. सोनार समाजाच्या व्यक्तींना अल्प व्याज दराने स्वयंरोजगाराकरिता कर्ज उपलब्ध करुन देणे व त्याची
   वसूली करणे.
३. सोनार समाजाची आर्थिक स्थिती सुधारण्यासाठी पतसाधने, साधनसामुग्री आणि तांत्रिक व व्यवस्थापकीय साधने पुरविणे.
४. सोनार समाजासाठी कृषी उत्पादने, वस्तू, साहित्य आणि सामुग्री यांची निर्मिती, जुळवणी व पुरवठा यासाठी आवश्यक वाटतील अशा सेवा देणे.

५. राज्यातील सोनार समाजाच्या कल्याणासाठी योजना सुरु करणे आणि त्यांना चालना देणे व योजनासाठी अहवाल तयार करणे.
६. महाराष्ट्र राज्य इतर मागासवर्गीय वित्त आणि विकास महामंडळाच्या धर्तीवर शासनाने मंजूरी दिलेल्या योजना राबविणे.

**३. संत नरहरी महाराज आर्थिक विकास महामंडळाच्या योजना :-**

**अ) २०% बीज भांडवल योजना :-**

१. राष्ट्रीयकृत बँका, जिल्हा अग्रणी बँका व जिल्हा मध्यवर्ती बँकांच्या माध्यमातून राबविते.
२. महामंडळाचा सहभाग २० %,
३. लाभार्थीचा सहभाग ५ % व बँकांचा सहभाग ७५% असतो.
४. या योजनेमध्ये महत्तम प्रकल्प मर्यादा ५.०० लक्ष आहे.
५. व्याजाचा दर ६% असून परतफेडीचा कालावधी ५ वर्षे आहे.

**ब) रु. १.०० लक्षपर्यंतची थेट कर्ज योजना :-**

१. शासनाकडून प्राप्त भाग भांडवलातून महामंडळ ही योजना राबविते.
२. रु. १.०० लक्ष पर्यंत थेट कर्ज उपलब्ध
३. लाभार्थीचा सहभाग निरंक.
४. ४८ समान मासिक हप्त्यांमध्ये मुद्दल रु. २,०८५/- नियमित परतफेड करणाऱ्या लाभार्थीना व्याज आकारण्यात येणार नाही. नियमित कर्जाची परतफेड न करणाऱ्या लाभार्थीना जेवढे कर्जाचे हप्ते थकित होतील त्या रकमेवर द.सा.द.से. ४% व्याज आकारण्यात येईल.

महाराष्ट्र राज्य इतर मागासवर्गीय वित्त आणि विकास महामंडळाकडून शासनाने मान्यता दिलेल्या खालीलप्रमाणे राबविल्या जाणाऱ्या कर्ज व्याज परतावा योजना संत नरहरी महाराज आर्थिक विकास महामंडळाकरीता देखील राबविल्या जातील.

**क) वैयक्तिक कर्ज व्याज परतावा :-**

१. शासनाकडून प्राप्त सहाय्यक अनुदान रकमेतून महामंडळ ही योजना राबवते.
२. बँकेकडून कर्जमर्यादा रु.१०.०० लक्षपर्यंत.
३. बँकेने रू. १०.०० लाखांपर्यंतच्या मर्यादेत कर्ज मंजूर केलेल्या उमेदवाराने वेळेत कर्जाचे हफ्ते भरल्यास, हफ्ता भरल्यावर त्यातील व्याजाची रक्कम (१२% च्या मर्यादेत) त्यांच्या आधार लिंक, बँक खात्यात दरमहा महामंडळामार्फत जमा करण्यात येईल. सदर योजना संपूर्णपणे संगणकीकृत असून सदर सार्वजनिक वित्तीय व्यवस्थापन प्रणाली (पीएफएमएस) अथवा तत्सम संगणक प्रणालीद्वारे राबविण्यात येईल. व्यवसायाच्या स्वरूपानुसार कर्ज रक्कम मंजूर करण्यात येईल.
४. कुटूंबातील एकाच व्यक्तीला या योजनेचा लाभ घेता येईल.
५. वेबपोर्टल / महामंडळाच्या संगणक प्रणालीवर नाव नोंदणी अनिवार्य.
६. कर्ज परतफेडीचा कालावधी बँक निकषांनुसार.

**ड) गट कर्ज व्याज परतावा योजना रु.१०.०० लक्ष ते रु.५०.०० लक्ष :-**

१. शासनाकडून प्राप्त सहायक अनुदान रकमेतून महामंडळ ही योजना राबविते.
२. बँकेकडून प्रती गटास कमीत कमी रु.१०.०० लक्ष ते जास्तीत जास्त रु. ५०.०० लक्षपर्यंतच्या मंजूर उद्योग उभारणीकरीता.
३. पात्र शेतकरी उत्पादक (Farmers Producers Organizations FPO) गटांना रु. १०.०० पर्यंत बिनव्याजी दराने कर्ज रक्कम उद्योगाकरीता देण्यात येईल.
४. योजना संपूर्णपणे संगणकीकृत असून सदर प्रक्रीया सार्वजनिक वित्तीय व्यवस्थापन प्रणाली (पीएफएमएस) अथवा तत्सम संगणक प्रणालीद्वारे राबविण्यात येईल.
५. मंजूर कर्जावर ५ वर्षापर्यंत अथवा कर्ज कालावधी या पैकी जे कमी असले ते, कर्ज मंजूर केलेल्या गटाने वेळेत कर्जाचे हप्ते भरल्यास, हप्ता भरल्यावर जास्तीत जास्त १२ टक्के व्याज दराच्या आणि रु.१५.०० लाखाच्या मर्यादेत त्यातील व्याजाची रक्कम त्यांच्या आधार लिंक बँक खात्यात दरमहा महामंडळामार्फत जमा करण्यात येईल.
६. महामंडळ केवळ बँकेने वेळेत वसूल केलेली योग्य व्याज रक्कम अदा करेल.
७. गटातील उमेदवारांनी महामंडळाच्या अधिकृत वेबपोर्टलवर अर्ज सादर करणे बंधनकारक असेल. प्रस्ताव सादर केल्यावर दिलेल्या अटी व शर्तीनुसार प्रस्ताव पात्र ठरत असल्यास गटास संगणकीकृत सशर्त हेतू पत्र (Letter of Intent) दिले जाईल. गटाने या आधारे बँकेकडून प्रकरणावर कर्ज मंजुर करुन घ्यावे लागेल.

**ई) शैक्षणिक कर्ज व्याज परतावा योजना :-**

१. राज्य, देशांतर्गत व आंतराष्ट्रीय अभ्यासक्रमासाठी प्रवेश घेतलेले सोनार समाजातील विद्यार्थी / विद्यार्थिनींना उच्च शिक्षणाकरीता बँकेमार्फत उपलब्ध शैक्षणिक कर्ज रकमेवरील व्याजाचा परतावा करणे.
२. विद्यार्थ्यांच्या शैक्षणिक हिताच्या दृष्टीकोनातून त्यांना उच्च शिक्षणासाठी प्रोत्साहित करणे, शैक्षणिक व आर्थिकदृष्टया सक्षम करणे.
३. सोनार समाजातील विद्यार्थी / विद्यार्थिनींना उच्च शिक्षणासाठी बँकेकडून राज्यांतर्गत व देशांतर्गत अभ्यासक्रमासाठी रु.१०.०० लक्ष व परदेशी अभ्यासक्रमासाठी रु.२०.०० लक्ष महत्तम कर्ज मर्यादेत वितरीत केलेल्या रकमेवरील कमाल १२% व्याज परतावा महामंडळामार्फत अदा करण्यात येईल.
४. विद्यार्थ्यांचे वय १७ ते ३० वर्ष असावे व तो इमाव प्रवर्गातील महाराष्ट्राचा रहिवाशी असावा.
५. अभ्यासक्रम :- १. आरोग्य विज्ञान, २. अभियांत्रिकी, ३. व्यावसायिक व व्यवस्थापन अभ्यासक्रम ४. कृषी, अन्नप्रक्रिया व पशुविज्ञान अभ्यासक्रम.

**(अ) राज्यांतर्गत अभ्यासक्रम:** केंद्रीय परिषद, कृषी विद्यापीठ परिषद, शासकीय अनुदानित व खाजगी मान्यताप्राप्त (NAAC मानांकन प्राप्त) शैक्षणिक संस्थेत अभ्यासक्रमासाठी शासनमान्य सामाईक पात्रता परीक्षा उत्तीर्ण झालेल्या व त्यानुसार प्रवेश घेतलेल्या विद्यार्थ्यांसाठी.

**(ब) देशांतर्गत अभ्यासक्रम:** देशातील नामांकित संस्थेत प्रवेश घेतलेले विद्यार्थी पात्र असतील.

**(क) परदेशी अभ्यासक्रमासाठी:** QS (Quacquarelli Symonds) च्या रैंकिंग / गुणवत्ता, पात्रता परीक्षा Graduate Record Exam (GRE), Test of English as a Foreign Language (TOEFL) उत्तीर्ण झालेले विद्यार्थी.

**(ड)** शैक्षणिक अभ्यासक्रमामध्ये सक्षम प्राधिकरणाने/शासनाने बदल किंवा नवीन अभ्यासक्रम समविष्ट केल्यास त्यानुषंगाने बदल करण्याचे अधिकार महामंडळाच्या संचालक मंडळास असतील.

**(उ) कौशल्य विकास प्रशिक्षण योजना :-**

**उद्देश :-** राज्यातील सोनार समाजातील परंपरागत व्यवसायाचे आधुनिकीकरण झालेले असल्यामुळे त्या परंपरागत व्यवसायात कार्यरत असलेल्या तसेच, इतर शैक्षणिक पात्रता धारण केलेल्या सोनार समाजातील पात्र व्यक्तींना आधुनिक प्रशिक्षणाचा लाभ व्हावा तसेच कौशल्य विकास प्रशिक्षण प्रदान करून कौशल्यपूर्ण बनवणे व त्याद्वारे रोजगार किंवा स्वयंरोजगार उपलब्ध करून देणे .

१. महाराष्ट्र राज्य इतर मागासवर्गीय वित्त आणि विकास महामंडळाकडून योजनेची प्रभावी मांडणी व अंमलबजावणीबाबत MSSDS यांना सहाय्य करणे.
२. प्रशिक्षण कार्यक्रमाबाबत MSSDS च्या पोर्टलला महामंडळाच्या पोर्टलशी जोडणी करण्यात येईल.
३. महामंडळाकडून सदर पोर्टलचे Login, Credential Customized करुन घेण्यात येईल.
४. महामंडळ निवडक प्रशिक्षण कार्यक्रमाची निवड करून त्याची अंमलबजावणी करेल.
५. समुपदेशन उपक्रम, असंघटित क्षेत्रातील काम करणाऱ्या लोकांमध्ये जनजागृती आणि मार्गदर्शन कार्यक्रमास मदत व समर्थन करण्यासाठी MSSDS च्या जिल्हा यंत्रणेशी महामंडळाची जिल्हा यंत्रणा सहाय्य करील.
६. किमान इयत्ता १० वी उत्तीर्ण व पुढील शिक्षण घेतलेले सोनार समाजातील युवकांना परंपरागत तसेच कौशल्य विकासासाठी कार्यरत असणाऱ्या व्यावसायिक/शैक्षणिक संस्था यांना प्रोत्साहित करुन सहाय्य करणे.

**ऊ) महिला स्वयंसिध्दी व्याज परतावा योजना :-**

१. सोनार समाजातील महिलांचे सक्षमीकरण करून त्यांना स्वावलंबी व आत्मनिर्भर करणे.
२. महिला बचत गटांना बँकांमार्फत वितरीत केलेल्या रु.५.०० लक्ष ते रु. १०.०० लक्षपर्यंतच्या कर्ज रकमेवरील १२% व्याजाच्या मर्यादेत व्याज परतावा महामंडळाकडून देण्यात येईल.
३. सदर योजना ही ऑनलाईन पध्दतीने राबविण्यात येत आहे.
४. पात्र महिला बचत गटातील फक्त इतर मागासप्रवर्गाच्या महिला अर्जदारांना व्याज परतावा योजनेचा लाभ महामंडळाकडून देण्यात येईल.
५. महिला आर्थिक विकास महामंडळाच्या CMRC मार्फत शिफारस केलेल्या महिला बचत गटात किमान ५०% सोनार समाजातील महिला असतील असा बचत गट व्याज परतावा योजनेसाठी पात्र राहील.
६. प्रथम टप्प्यातील कर्ज नियमित परतफेडीनंतर सदर बचत गट द्वितीय टप्प्यात रु.१०.०० लक्ष पर्यंत कर्ज बँकेकडून मंजूर करुन घेण्यास पात्र होईल.
७. महिला बचत गटातील महिला इतर मागास प्रवर्गातील व महाराष्ट्राची रहिवाशी असावी.

८. पात्र महिलांचे किमान वय १८ व कमाल वय ६० वर्षे राहील.

९. महामंडळामार्फत महिला बचत गटाच्या बँक खात्यामध्ये दर तिमाही व्याजाचा परतावा बँकेच्या मंजूरीनुसार ५ वर्षापर्यंतच्या कालावधीकरीता बँक प्रमाणिकरणानुसार अदा करण्यात येईल.

१०. सदर योजना महिला आर्थिक विकास महामंडळाच्या लोकसंचालित साधनकेंद्र (CMRC) च्या सहाय्याने राबविण्यात येत आहे.

११. CMRC मार्फत प्राप्त झालेल्या प्रस्तावास महामंडळामार्फत पात्रता प्रमाणपत्र निर्गमित करण्यात येईल.

**४.** महाराष्ट्र राज्य इतर मागासवर्गीय वित्त आणि विकास महामंडळ या मुख्य कंपनीच्या योजनांमध्ये काही बदल झाल्यास सदर बदल संत नरहरी महाराज आर्थिक विकास महामंडळ या उपकंपनीसही लागू राहतील.

५. संत नरहरी महाराज आर्थिक विकास महामंडळाचे (उपकंपनी) मुख्यालय मुंबई येथे व जिल्हा स्तरावरील कामकाज महाराष्ट्र राज्य इतर मागासवर्गीय वित्त आणि विकास महामंडळाच्या ३६ जिल्हयांच्या ठिकाणी कार्यरत असणाऱ्या कार्यालयांमधील अधिकारी / कर्मचाऱ्यांमार्फत पाहण्यात येईल.

**६.** संत नरहरी महाराज आर्थिक विकास महामंडळास (उपकंपनी) अधिकृत भागभांडवल रु.५०.०० कोटी (अक्षरी रुपये पन्नास कोटी फक्त) मंजूर करावे.

**७.** तसेच, दरवर्षी या महामंडळास विविध योजना राबविण्यासाठी रु.५.०० कोटी (अक्षरी रुपये पाच कोटी फक्त) इतके भागभांडवल मंजूर करण्यात यावे.

**८.** संत नरहरी महाराज आर्थिक विकास महामंडळ (उपकंपनी) कामकाजाकरिता मुख्यालयासाठी एकुण १६ पदे मंजूर करण्यात येत आहेत. त्याबाबतचा तपशील खालीलप्रमाणे:-

| **अ.क्र.** | **पदनाम** | **वेतनश्रेणी** | **आवश्यक पदे** |
|---|---|---|---|
| १ | महाव्यवस्थापक | वेतन स्तर एस - २३<br>रू .६७७०० - २०८७००/- | १ |
| २ | उपमहाव्यवस्थापक | वेतन स्तर एस - २३<br>रू. ६७७०० - २०८७००/- | १ |
| ३ | मुख्य वित्तीय अधिकारी (प्रतिनियुक्ती) | वेतन स्तर एस - २०<br>रू.५६१०० - १७७५००/- | १ |
| ४ | मा. अध्यक्षांचे खाजगी सचिव | वेतन स्तर एस - १६<br>रू. ४४९०० - १४२४००/- | १ |
| ५ | कंपनी सचिव | वेतन स्तर एस - १५<br>रू. ४१८०० - १३२३००/- | १ |
| ६ | सहायक महाव्यवस्थापक | वेतन स्तर एस - १५<br>रू. ४१८०० - १३२३००/- | २ |
| ७ | लेखापाल | वेतन स्तर एस - ०८<br>रू. २५५०० - ८११००/- | २ |

| | | | |
|---|---|---|---|
| ८ | लिपिक – टंकलेखक | वेतन स्तर एस - ०६<br>रू. १९९०० - ६३२००/- | ४ |
| ९ | वाहन चालक | वेतन स्तर एस - ०६<br>रू. १९९०० - ६३२००/- | १ |
| १० | शिपाई | वेतन स्तर एस - ०१<br>रू. १५,००० - ४७,६००/- | २ |
| **एकूण** | | | **१६** |

**९.** सन २०२४ - २५ या आर्थिक वर्षात संत नरहरी महाराज आर्थिक विकास महामंडळ या उपकंपनी करिता वेतन रु.१३४.०० लक्ष व वेतनेत्तर खर्चासाठी रु.३२.०० लक्ष, अशी एकूण रु.१५४.०० लक्ष इतकी तरतूद मंजूर करण्यात येत आहे. तसेच मुख्य कंपनीच्या आस्थापनेवरील पदाच्या कार्यभार व निकषानुसार उपकंपनीतील मंजूर पदाकरिता कार्यभार व निकष लागू राहतील.

**१०.** संत नरहरी महाराज आर्थिक विकास महामंडळ या उपकंपनीचे मुख्यालय मुंबई येथे महाराष्ट्र राज्य इतर मागासवर्गीय वित्त आणि विकास महामंडळाच्या मुख्यालयाअंतर्गत राहील.

**११.** जिल्हा स्तरावरील कामकाजासाठी महाराष्ट्र राज्य इतर मागासवर्गीय वित्त आणि विकास महामंडळांच्या जिल्हा कार्यालयातील मंजूर अधिकारी/कर्मचाऱ्यांकडूनच उपकंपनीचे कामकाज करण्यात येईल.

**१२.** महाराष्ट्र राज्य इतर मागासवर्गीय वित्त आणि विकास महामंडळाचे सध्याचे व्यवस्थापकीय संचालक हे या उपकंपनीचे सध्याचे व्यवस्थापकीय संचालक म्हणून काम पाहतील.

**१३.** संत नरहरी महाराज आर्थिक विकास महामंडळाचे (उपकंपनी) नोंदणीकृत कार्यालय मुंबई येथे राहील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२५०३०४१२५३०२९३३४ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Digitally signed by RAVINDRA RAMDAS PETKAR
Date: 2025.03.04 12:53:55 +05'30'

**(र. रा. पेटकर)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२. मा. सभापती / उपसभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
३. मा. अध्यक्ष / उपाध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
४. मा. विरोधी पक्षनेता, विधानपरिषद / विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.

५. मा. मुख्यमंत्री यांचे अ.मु.स., मंत्रालय, मुंबई.
६. मा. उपमुख्यमंत्री (नगर विकास) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
७. मा. उपमुख्यमंत्री (वित्त) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
८. मा. मंत्री (इतर मागास बहुजन कल्याण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
९. सर्व मा. मंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
१०. सर्व सन्माननीय सदस्य, विधानपरिषद / विधानसभा.
११. प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१ व २, महाराष्ट्र, मुंबई / नागपूर.
१२. प्रधान महालेखापाल (लेखा परीक्षा)-१ व २, महाराष्ट्र, मुंबई / नागपूर.
१३. संचालक, समाज कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१४. संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१५. विभागीय समाज कल्याण अधिकारी, मुंबई विभाग, नवी मुंबई (दोन प्रती)
१६. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य इतर मागासवर्गीय वित्त आणि विकास महामंडळ मर्या., मुंबई.
१७. प्रादेशिक व्यवस्थापक, महाराष्ट्र राज्य इतर मागासवर्गीय वित्त आणि विकास महामंडळ मर्या,, मुंबई शहर / ठाणे / छत्रपती संभाजीनगर / नागपूर / पुणे / नाशिक
१८. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परिक्षा) महाराष्ट्र १ / २. मुंबई / नागपूर
१९. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
२०. जिल्हा कोषागार अधिकारी, मुंबई, ठाणे.
२१. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
२२. अपर कोषागार अधिकारी, कोकण भवन, नवी मुंबई.
२३. वित्त विभाग (कार्यासन व्यय १४ / अर्थोपाय / अर्थसंकल्प-३ / साउ), मंत्रालय, मुंबई.
२४. सहसंचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासन भवन, पाचवा मजला, मंत्रालय, मुंबई
२५. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), इतर मागास बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
२६. निवडनस्ती (महामंडळे).